**निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयाच्या संकेतस्थळावर Dashboard तयार करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निभासं -२०२०/१२७/(९२/२०)/कार्या-१७.**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १२ नोव्हेंबर, २०२०

वाचा:- निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे दि. ०५.१०.२०२० चे पत्र

**शासन निर्णय -**

निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयाच्या संकेतस्थळावर Dashboard तयार करण्यासाठी रु. ४,२७,०८०/- अधिक रु. ७६,७८४.४०/- G.S.T. मिळून एकूण रु. ५,०३,९५४.४०/-इतक्या खर्चाच्या MahaITने सादर केलेल्या प्रस्तावास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव वाचा येथील दि. ०५.१०.२०२० च्या पत्रान्वये शासनास प्राप्त झाला आहे. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. सन २०२०-२१ या वर्षाकरिता खालील लेखाशीर्षाखाली रु. ३,३०,०००/- इतके अनुदान मंजूर करण्यात आले आहे. :-

" मागणी क्र. जे-२, ३४७५-इतर सर्वसाधारण आर्थिक सेवा , २००-इतर व्यवसाय उपक्रमाचे विनियमन, (००) (०१), निबंधक भागीदारी संस्था, मुंबई, नागपूर, औरंगाबाद आणि पुणे (अनिवार्य) (३४७५००८४)-१७ संगणक खर्च "

३. उपरोल्लखित रु. ३,३०,०००/इतक्या मंजूर अनुदानापैकी, निबंधक भागीदारी संस्थेच्या मुंबई, नागपूर, औरंगाबाद आणि पुणे या चार कार्यालयाच्या संगणकांसाठी Anti-virus, किरकोळ दुरुस्ती , Keyboard, mouse इ. चा खर्च तसेच प्रिंटर्ससाठी नवीन कार्टीज, कार्टीज रिफीलींग, किरकोळ दुरुस्ती त्याचप्रमाणे network देखभालीच्या खर्चासाठी रु. १, ८०,०००/- इतकी रक्कम व निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयाच्या संकेतस्थळावर Dashboard तयार करण्यासाठी रु. १, ५०,०००/- इतकी रक्कम अशी एकूण रु. ३,३०,००० इतकी रक्कम वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयासाठी, " १३ कार्यालयीन खर्च " ( संकेतांक क्र. ३४७५००८४ ) या उद्दिष्टांतर्गत रु. १२,०५,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पित असून रु. ५,४२,००० /- इतका निधी वितरित करण्यात आला आहे. सदर मंजूर तरतूदीपैकी Dashboard तयार करण्यासाठी रु. ३,५४,०००/- इतका निधी " १७ -संगणक खर्च " या उद्दिष्टाखाली पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन घेण्याबाबत निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी योग्य ती पुढील कार्यवाही करावी.

२. सदर निधी मंजूर प्रयोजनासाठीच खर्च करण्यात येईल, याबाबत निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी दक्षता घ्यावी.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ५२०/२०२०/व्यय -५, दि. ०६.११.२०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१११३१२२१०५४२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kamini R Pilankar

Digitally signed by Kamini R Pilankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bd66db73425a9730e4074ae475eb26788ae32a45d13639a02fcf2ffbd43272ff, serialNumber=791d70f75a8bfaa8349786f02d71cad4fb9d1999ea0d92d63dcf5de198d4f817, cn=Kamini R Pilankar
Date: 2020.11.13 12:24:39 +05'30'

**( का. रा. पिळणकर )**
कार्यासन अधिकारी

**प्रति-**

१) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा ), महाराष्ट्र-१ , मुंबई.
२) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
४) निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५) वित्त विभाग (व्यय-५/अर्थसंकल्प-११),मंत्रालय, मुंबई
६) कार्यासन अधिकारी (कार्या-२३), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) कार्यासन १७-संग्रहार्थ.